# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.१५/२०१६/१७-स

नवीन प्रशासकीय भवन, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०८ फेब्रुवारी, २०१७

**संदर्भ -**

१) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३,दि.२०,एप्रिल २०१६.
२) शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.१५/२०१६/१७ स, दि. २८,एप्रिल,२०१६.
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः पुरक-२०१६/प्र.क्र.१२८/अर्थ-३,दि.१२,ऑगस्ट २०१६.
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः पुरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थ-३, दि.०४,जानेवारी,२०१७.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः संकिर्ण-२०१७/प्र.क्र.७/कोषा प्र-५/दि.१७,जानेवारी,२०१७.
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.०८,फेब्रुवारी,२०१७.

**शासन परिपत्रक-**

वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्रं.१ च्या परिपत्रकानुसार सन २०१६-१७ करीता योजनेतर व योजनांर्तगत योजनांचा अर्थसंकल्पित निधी ८०% च्या मर्यादेत वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्रं. ६ च्या परिपत्रकानुसार सन २०१६-१७ चा उर्वरित कालावधी, वितरीत निधी व त्याचा झालेले विनियोग पाहता उर्वरित योजनेतर तसेच योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी खर्च करण्याची मर्यादा आता योजनेतरसाठी ९०% व योजनांतर्गतसाठी ८०% विहित करण्यात आली आहे. यानुसार मासिक विवरणपत्रानुसारचा निधी ३१ मार्च,२०१७ पर्यंत पुढे/मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्प अंदाज,वितरण व संनियत्रंण प्रणालीवर देण्यात आलेली आहे. केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी वितरणाची मर्यादा १००% इतकी राहील. मात्र या केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वितरीत करताना वित्त विभागाच्या दि.२०.४.२०१६ ,दि.१२.०८.२०१६ व दि.०४.१.२०१७ च्या परिपत्रकामधील सुचनांचे पालन करण्यात यावे.

२. याव्यतिरिक्त ०१-वेतन,०२-मजूरी,०४-निवृत्तीवेतन खर्च, ०६-दूरध्वनी खर्च,२२-शस्त्रे व दारुगोळा,३३-अर्थसहाय्य,३६-सहायक अनुदाने (वेतने),४५-व्याज,५५-कर्जे व आगाऊ रकमा, व ५६-कर्जाची परतफेड यासाठी योजनेतर व योजनांतर्गत तरतूदीचा उर्वरित २०% निधी पूर्वीच्या पध्दतीने एकत्रितरित्या वितरीत करण्यास सहमती दिलेली आहे.म्हणजेच यासाठी आता १००% तरतूद उपलब्ध राहील.

३. निधीचे वितरण करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पिय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना व प्रचलित निकष, वित्तिय अधिकाराचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि. २०.४.२०१६ व दि.१७.१.२०१७ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्याच्या अधीन राहुन संगणक वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येणा-या

तरतूदी नियंत्रक अधिकारी यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे. तसेच योजनानिहाय प्रशासकीय /वित्तिय मंजूरीचे आदेश संबंधीत कार्यासनामार्फत निर्गमित करण्यात येतील हे आदेश प्राप्त झाल्यानंतरच योजनांतर्गत/योजनेतर योजनांसाठीचा निधी खर्च करण्याची व संगणक वितरण प्रणालीवर निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन परिपत्रक प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०२०९१२५०४८३६०२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Seema Baban Jadhav
Date: 2017.02.09 12:53:08 +05'30'

**( सी.ब.जाधव )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त (साखर),महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक, (पणन) , पणन संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. संचालक, रेशीम संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागूपर.
५. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागूपर.
६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई.
७. सचिव, महाराष्ट्र राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
८. महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता/स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३. उप सचिव (श्री चव्हाण/श्री कुलकर्णी /श्री गायकवाड/श्री खोरगडे/श्री देसाई/श्री वळवी), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१४. विशेष कार्य अधिकारी (श्री शिंगटे) ,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१५. उप सचिव, (अर्थसंकल्प-१३,व व्यय-२) वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
१६. उप सचिव (का-१४११/१४३१), नियोजन विभागमंत्रालय,, मुंबई
१७. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१८. निवड नस्ती कार्यासन क्रमांक (१७स )सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.